| वितरण आदेश क्रमांकः १<br>कोषागारातून रोख रक्कम देय अनुदान<br>२०१०-२०११. | पंचायत राज संस्थांना केंद्रपुरस्कृत १३ व्या वित्त आयोगांतर्गत स्पेशल एरिया बेसिक ग्रँटच्या सन २०१०-११ च्या पहिल्या हप्त्याच्या प्राप्त अनुदानाचे वितरण. |
|---|---|

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन निर्णय क्रमांकः तेविआ-२०१०/प्र.क्र. ४३ / वित्त-४,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ३० ऑगस्ट,२०१०

वाचा:- शासन निर्णय क्रमांकः तेविआ-२०१०/प्र.क्र. २२ /वित्त-४, ग्राम विकास व जलसंधारण विभाग मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक :३० ऑगस्ट,२०१०.

प्रस्तावना :- पंचायत राज संस्थांना त्यांचे बळकटीकरणासाठी १३ व्या वित्त आयोगाअंतर्गत स्पेशल एरिया बेसिक ग्रँटच्या स्वरुपात राज्य शासनास प्राप्त होणारा निधी प्रत्येक वर्षी राज्यातील स्पेशल एरिया अंतर्गत येणा-या १२ जिल्ह्यातील ग्रामपंचायतींच्या स्तरावर उपयोगात आणावयाचा आहे. १३ व्या वित्त आयोगाअंतर्गत स्पेशल एरिया बेसिक ग्रँटच्या स्वरुपात प्राप्त होणा-या निधीतून ग्राम पंचायत स्तरावर घ्यावयाच्या बाबी आणि निधीचा विनियोग कशाप्रकारे करावयाचा, याबाबतच्या सूचना संदर्भांकित शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या आहेत. सन २०१०-११ साठी केंद्र शासनाकडून स्पेशल एरिया बेसिक ग्रँटच्या स्वरुपात पहिल्या हप्त्यापोटी रु.३.९५ कोटी इतका निधी राज्यास प्राप्त झाला असून तो निधी स्पेशल एरिया अंतर्गत येणा-या १२ जिल्ह्यातील ग्रामपंचायतींना सन २०१०-११ या चालू आर्थिक वर्षात वितरीत करावयाचा आहे. त्यानुसार शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय :-

या शासन निर्णयान्वये १३ व्या वित्त आयोगाचा सन २०१०-११ या वित्तीय वर्षाचा स्पेशल एरिया बेसिक ग्रँटच्या स्वरुपातील **पहिल्या हप्त्याचा** रु.३,९५,००,०००/- (रु.३ कोटी ९५ लाख रुपये फक्त) इतका निधी सोबतच्या प्रपत्रात दर्शविलेल्या १२ जिल्ह्यांना, स्पेशल एरिया अंतर्गत (आदिवासी उपयोजना मुख्य क्षेत्र) येणा-या गावांच्या लोकसंख्येनुसार वितरीत करण्यात येत आहे.सदर अनुदान सोबतच्या प्रपत्रामध्ये नमूद केलेल्या जिल्हा परिषदांच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या बी.डी.एस.वर वितरीत करण्यात येत आहे.

२. विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे जिल्हापरिषदनिहाय अनुदानाची रक्कम प्राप्त झाल्यानंतर संदर्भाधीन शासन निर्णयात नमूद केलेल्या विहीत निकषांनुसार मुख्य कार्यकारी अधिकारी यानी स्पेशल एरिया अंतर्गत येणा-या ग्रामपंचायतींना वितरीत करावयाच्या निधीचे प्रगणन करावे व त्यानुसार स्पेशल एरिया अंतर्गत येणा-या

ग्रामपंचायतींना देय असणारा निधी ५ ते १० दिवसाचे आत इ.सी.एस. (Electronic Clearance System)./एन.इ.एफ.टी (National Electronic Fund Transfer) किंवा आर.टी.जी.एस (Real Time Gross Settlement) यापैकी उपलब्ध असलेल्या बँकिंग सिस्टीमद्वारे, सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद यांनी स्पेशल एरियात अंतर्भूत असलेल्या संबंधित ग्राम पंचायतीच्या खात्यावर वर्ग करावा.एका ग्रामपंचायतीचे अंतर्गत एकापेक्षा जास्त गावे येत असतील तर त्या सर्व गावांचा प्रगणनानुसार अनुज्ञेय निधी त्या गट ग्रामपंचायतींच्या खात्यावर वर्ग करावा.

३. <u>प्राप्त निधीचा विनियोग निधी वितरीत झाल्यापासून सहा महिन्याच्या आत करावयाचा आहे.</u> निधी विहित वेळेत खर्च करण्याची जबाबदारी संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तसेच संबंधित गट विकास अधिकारी, पंचायत समिती व ग्रामसेवक / ग्राम विकास अधिकारी, ग्रामपंचायत यांची राहील. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी, स्पेशल एरिया अंतर्गत येणा-या ग्रामपंचायतींना वितरीत निधीतून झालेल्या खर्चाचा आढावा प्रत्येक महिन्यात घ्यावा व हा निधी शासनाने मंजूर केलेल्या प्रयोजनासाठी व विहित वेळेत खर्च करावा यादृष्टीने योग्य अशा उपाययोजना कराव्यात. **<u>निधी खर्च करताना संदर्भाधीन शासन निर्णयात दिलेल्या सूचनांचे तंतोतंत पालन करुन निधी खर्च करावा.</u>** हा निधी फक्त ग्रामपंचायत स्तरावर वितरीत होणार असल्याने उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत) यांनी सदर निधी नियमानुसार व विहित वेळेत खर्च होईल याकडे कटाक्षाने लक्ष द्यावे. या बाबीचा सतत पाठपुरावा करावा. ज्या गटविकास अधिकारी यांच्या अधिनस्त ग्रामपंचायतींना हा निधी वितरीत होणार आहे, त्या गटविकास अधिका-यांना याबद्दल सक्त सूचना द्याव्यात. संबंधित ग्राम पंचायतीच्या ग्रामसेवक/ग्राम विकास अधिका-यांना मार्गदर्शन करावे व निधी शासन निर्णयातील निकषानुसार विहित वेळेत खर्च होईल याची दक्षता घ्यावी. निधी विहित वेळेत खर्च न झाल्यास त्याची सर्व जबाबदारी अंतिमत: मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील व त्याची नोंद त्यांच्या गोपनीय अहवालात घेण्यात येईल.

४. सदर निधी सन २०१०-११ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून वितरीत करण्यात येत असून हा निधी खर्च करण्यास शासनातर्फे मान्यता देण्यात येत आहे. या निधीतून बाबनिहाय झालेल्या खर्चाची माहिती, शासनाकडून विहीत करण्यात येईल त्या विवरण पत्रानुसार पुढील प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास न चुकता सादर करावी. तसेच, शासनाने मागणी केल्यावर किंवा प्रत्येक हप्त्याची रक्कम विहित केलेल्या वेळेत खर्च झाल्याबरोबर निधीच्या खर्चाचे अंतिम उपयोगिता प्रमाणपत्र व आर्थिक/ भौतिक अहवाल शासनास आणि महालेखापाल कार्यालयास पाठविण्यात यावा.

५. या बाबीवर होणारा खर्च मागणी क्र.एल-३, २५१५ - इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १९६ - जिल्हा परिषद/जिल्हा स्तरीय पंचायतीस सहाय्य, ३१ - सहाय्यक अनुदाने, (००) (०१) १३ व्या वित्त आयोगाच्या

शिफारशीनुसार पंचायत राज संस्थांना विविध विकास योजनांसाठी अनुदाने (योजनेतर) (२५१५ १५२३) या लेखाशिर्षांखाली सन २०१०-२०११ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची टाकावा व या निधीचे सर्व लेखे स्वतंत्रपणे ठेवावेत.

६. सदरचा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५९९/१०/अर्थ.१७, दि.११/०८/२०१० नुसार निर्गमित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. **२०१००९०११८३६०५००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( प्रतिभा मा. पाटील )**
**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन.**

प्रति,

मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव
मा.सचिव (ग्रा.वि. व पं.रा.) यांचे स्वीय सहाय्यक
महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखापरीक्षा), मुंबई (पाच जादा प्रतीसह)
महालेखापाल, महाराष्ट्र - २ (लेखापरीक्षा), नागपूर (पाच जादा प्रतीसह)
सर्व विभागीय आयुक्त.(महसूल)
सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष.
मुख्य लेखा परिक्षक , स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
सर्व सहमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा (सर्व विभाग)
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत)
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
वित्त विभाग का.क्र.(व्यय-१५/अर्थोपाय /वित्त आयोग कक्ष/अर्थसंकल्प-१७)
कक्ष अधिकारी, कार्यासन क्र. वित्त-१/वित्त-७/वित्त-८, ग्राम विकास विभाग,मंत्रालय, मुंबई - ३२
निवड नस्ती का.क्र.वित्त-४, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२

d/kewari/vitaran adesh/GR 13 FC polot.distributio for special area grant.lwp
एच-२२७५ -२

**स्पेशल एरिया बेसिक ग्रँट वितरण आदेश क्रमांकः १**
**शासन निर्णय क्रमांक तेविआ २०१०/ प्र.क्र. ४३/ वित्त-४,**
**दिनांक- ३० ऑगस्ट,२०१० चे प्रपत्र.**

(रु. हजारात)

| अ.क्र. | जिल्हा परिषदेचे नाव | एकूण रक्कम |
|---|---|---|
| १ | ठाणे | ११८५६ |
| २ | नाशिक | ७२३३ |
| ३ | धुळे | २०३१ |
| ४ | नंदूरबार | ७६२७ |
| ५ | जळगाव | ३७४ |
| ६ | अहमदनगर | ७९० |
| ७ | पुणे | ६८८ |
| ८ | नांदेड | १२०२ |
| ९ | अमरावती | १५७१ |
| १० | यवतमाळ | १२९३ |
| ११ | चंद्रपूर | ८१७ |
| १२ | गडचिरोली | ४०१८ |
| | एकूण | ३९५०० |

( प्रतिभा मा. पाटील )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.

----------

d/kewari/vitaran adesh/GR 13 FC polot.distributio for special area grant.lwp
एच-२२७५ -२अ.